वनक्षेत्रपाल वन्यजीव चांदोली उत्तर स्थित हेळवाक यांना स्वतंत्र आहरण व संवितरण अधिकारी (DDO) घोषीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम - २०१५/प्र.क्र.१५५/फ-२**
**मादाम कामा रोड,हूतात्मा राजगुरू चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक : १७.०७.२०१५**

वाचा :- १) वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक-मकोनि-१०००/प्र.क्र.४४/०५,कोषा- प्र.५, दि.०४.०१.२००६
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दूय्यम संवर्ग) म.रा.नागपूर यांचे आदेश क्र.कक्ष-७(१)/आस्था/१/बैठक/प्र.क्र.६७/११३७ दि.०१.१२.२०१२
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र.क्र. कक्ष-२ (१)/असं/प्र.क्र.१५/भाग-३/२६/२०१५-१६, दि. ३०.०४.२०१५.

**प्रस्तावना** -

शासनाच्या वन विभागाच्या क्षेत्रिय कार्यालयातील कर्मचाऱ्यांची वेतन व भत्यांची देयके फेब्रुवारी-२००६ पासून इतर विभागाच्या कर्मचाऱ्यांप्रमाणेच कोषागारातून पारित करण्याबाबत वित्त विभागाच्या संदर्भ क्र.१ वरील दि.०४.०१.२००६ च्या शासन निर्णयान्वये निर्णय घेण्यात आला आहे. यानुसार महाराष्ट्र कोषागार नियम १९६८, खंड-१ मधील नियम १३ नुसार व नियम १५ (३) नुसार विभागातील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांची यादी महालेखापाल कार्यालयाकडे पाठविण्यात येते. यानुसार वेळोवेळी निर्गमीत केलेल्या शासन निर्णयानुसार विभागातील आहरण व संवितरण आधिकाऱ्यांच्या याद्या प्रसिध्द करण्यात आल्या आहेत.

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन दुय्यम संवर्ग) म.रा.नागपूर यांचेकडील आदेश क्रमांक कक्ष-७(१)/आस्था/१/बैठक/प्र.क्र.६७/११३७ दि.०१.१२.२०१५ अन्वये वन्यजीव शाखेचे आस्थापना बळकटीकरणा अंतर्गत ठाणे वनविभागातील वनक्षेत्रपालाची ०३ पदे वन्यजीव शाखेकडे वर्ग करण्यात आलेली असुन त्यापैकी २ पदे मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), कोल्हापूर यांचेकडे वर्ग करण्यात येऊन सदर पदाचे पदनाम खालील प्रमाणे करण्यात आलेले आहे:-

अ)वनक्षेत्रपाल (वन्यजीव) चांदोली उत्तर स्थित हेळवाक.

ब) वनक्षेत्रपाल (वन्यजीव) फिरते पथक सह्याद्री व्याघ्र प्रकल्प स्थित कराड (मुख्यालय कराड).

सदर वनक्षेत्रातील अधिकारी/कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्ते तसेच इतर आर्थिक बाबी हाताळण्याकरिता वन परिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव),चांदोली(स्थित हेळवाक) या पदनामास आहरण संवितरण अधिकारी म्हणून नामनिर्देशित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपुर यांनी दि.३०.०४.२०१५ च्या पत्रान्वये प्रस्तावीत केल्याप्रमाणे खालील वन परिक्षेत्र अधिकारी यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे:-

| अ.क्र | आहरण व संवितरण अधिकाऱ्याचे पदनाम | मुख्यालय | जिल्हा व मुख्य कोषागार ठिकाण | जवळचे उपकोषागार कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १. | वनपरिक्षेत्र अधिकारी (वन्यजीव), चांदोली (स्थित हेळवाक) | हेळवाक | सातारा | उपकोषागार,कार्यालय, पाटण,जि.सातारा |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०१५०७१७११२३२८०११९ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatraye Laxman Thorat

Digitally signed by Dattatraye Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dattatraye Laxman Thorat
Date: 2015.07.17 11:26:00 +05'30'

**डी.एल.थोरात**
सह सचिव
महसूल व वन विभाग.

**प्रति :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव),महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२.अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव),पश्चिम मुंबई.
४.मुख्य वनसंरक्षक तथा क्षेत्र संचालक सह्याद्री व्याघ्र प्रकल्प कोल्हापूर/पूणे.
५.जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.
६.उपकोषागार कार्यालय,पाटण,जि.सातारा.
७.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा),१/२,मुंबई/नागपूर.
८.वित्त विभाग, कार्यासन कोषा. प्र-५, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती (फ-२), महसूल व वन विभाग.